नक्षलवादी,अतिरेकी,गुन्हेगार,समाजकंटक इत्यादि समाज विघातक शक्तीविरुध्द कारवाईत मरण पावलेल्या पोलीस कर्मचाऱ्यांच्या वारसांना तात्काळ नोकरी देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग,
क्रमांक:आरसीटी-०८०२/प्र.क्र.५१५/पोल-५ब,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,दिनांक:१६ डिसेंबर,२००२.

**प्रस्तावना:-**

पोलीस दलातील कर्मचा-यांना अहोरात्र अतिशय जोखमीचे,जीवावर बेतणारे काम करावे लागते.घनदाट जंगलातील सशस्त्र नक्षलवादी,सुसज्ज गुंड टोळ्या व संघटीत गुन्हेगारी यांच्याबरोबर सतत सामना करण्याचा प्रसंग उद्‌भवत असतो.महाराष्ट्रातील संघटीत टोळयांची वाढती गुन्हेगारी व नक्षलवाद्यांची कारवाई नेस्तनाबूत करण्यासाठी पोलीसांना सतर्क राहून सामना करावा लागतो. यामध्ये ब-याचवेळा पोलीसांना आपला जीव गमवावा लागतो. अशी घटना घडल्यानंतर पोलीसांच्या कुटुंबावर अतिशय दु:खद प्रसंग ओढवतो. घरातील कर्ता पुरुष गेल्यामुळे आर्थिक परिस्थिती खूप हालाखीची होते.अशा वेळी त्या कुटुंबाला तात्काळ मदत करणे अत्यंत गरजेचे असते.

सध्या अस्तित्वात असलेल्या अनुकंपा तत्वानुसार सेवेत असतांना दिवंगत झालेल्या कर्मचा-यांच्या वारसांना एकत्रित प्रतिक्षा यादीनुसार जसजशा जागा रिक्त होतील त्यानुसार नोकरी देण्यात येते. या यादीमध्ये कारवाईत मरण पावलेल्या पोलीस कर्मचाऱ्यांच्या वारसांच्या नांवाचा समावेश असतो. सध्याच्या कार्यपध्दतीनुसार कारवाईत मरण पावलेल्या कर्मचा-यांच्या वारसांना तात्काळ नोकरी देणे शक्य होत नाही. अशा कर्मचा-याच्या वारसांना तात्काळ नोकरी देण्याविषयीची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**निर्णय:-**

बृहन्मुंबईतील अनुकंपा तत्वावरील नियुक्तीसाठी लिपिकवर्गीय पदांची यादी सामान्य प्रशासन विभागात संकलित करण्यात येते व प्रत्येक जिल्हयातील विभाग/कार्यालयात अनुकंपा तत्वावर नियुक्तीसाठी येणा-या अर्जांची जेष्ठतेच्या दिनांकानुसार नावाची यादी जिल्हाधिकारी कार्यालयात संकलित करण्यात येते. या यादी **व्यतिरिक्त** नक्षलवादी,अतिरेकी,गुन्हेगारी व समाजकंटक इत्यादी समाज विघातक शक्तीविरुध्द कारवाई

C:\WINDOWS\Desktop\Neha\POL 5 B\DEC 64

करतांना मरण पावलेल्या पोलीस कर्मचाऱ्यांच्या वारसांची नांवे अशा एकत्रित प्रतिक्षासूचित समाविष्ट न करता त्यांची प्रत्येक जिल्हाधिकारी कार्यालयात व बृहन्मुंबईसाठी सध्याच्या कार्यपध्दतीनुसार पोलीस आयुक्त/सामान्य प्रशासन विभागात स्वतंत्र यादी ठेवून त्यांना सर्व प्राथम्य देऊन नियुक्ती देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीनूसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( शि.शं. धुमाळे )
सह सचिव,महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रत,

पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई,
पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई,
सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक,
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व पोलीस अधीक्षक,
सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई.

C:\WINDOWS\Desktop\Neha\POL 5 B\DEC 64